वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-२
<u>वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक सीईआर-२०१८/प्र.क्र.८१/३०**
राजशिष्टाचार, ३रा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक :- ३० जुलै, २०१८.

**वाचा** :- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण १०१४/प्र.क्र.१०३/१९-अ, दिनांक २० नोव्हेंबर, २०१५.

**प्रस्तावना :-**

शासनाने संदर्भिय दि.२०.११.२०१५ च्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-दोन मध्ये सामान्य प्रशासन (खुद्द) व विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर शासन निर्णया सोबतच्या विवरण पत्र- ब मधील अ.क्र.३, ४ व ५ येथील अनुक्रमे प्रजासत्ताक दिन (२६ जानेवारी), महाराष्ट्र दिन (१ मे) व स्वतंत्रता दिन (१५ ऑगस्ट) या प्रत्येक समारंभाच्या आयोजनाच्या खर्चाला मंजूरी देण्याबाबत प्रधान सचिव व राजशिष्टाचार अधिकारी यांना प्रत्येकी रु.२५ लक्ष इतके वित्तिय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर वित्तिय अधिकार मर्यादेत वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

प्रजासत्ताक दिन (२६ जानेवारी), महाराष्ट्र दिन (१ मे) व स्वतंत्रता दिन (१५ ऑगस्ट) या प्रत्येक वर्षाच्या समारंभाच्या आयोजनासाठी प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांना प्रत्येक समारंभासाठी रु.२५ लक्ष एवढे वित्तीय अधिकार दिनांक २० नोव्हेंबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेले आहेत. आता प्रत्येक समारंभासाठी प्रतिवर्ष रु.२५ लक्ष वित्तीय मर्यादेऐवजी रु.७० लक्ष इतकी वित्तीय मर्यादा सुधारण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सोबत जोडलेल्या विवरण पत्र-ब मधील अनुक्रमांक ३ ते ५ मध्ये सुधारणा करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३१८/२०१८/विनियम, दिनांक १.६.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७४/२०१८/व्यय-४, दिनांक २८.५.२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०११३०६५१८००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्याआदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Protocol, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96b5b527d7131539d3b3eb3ba523bb3514dd3d3437a78ac0f73c6d8043215729, cn=Satish Karbhari Jondhale
Date: 2018.08.01 13:10:35 +05'30'

**(स.का. जोंधळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई .

४. प्रधान सचिव (ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई .
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई .
६. प्रधान सचिव व राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई .
८. संचालक तथा उप सचिव, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई (कार्यासन-३० मार्फत)
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा),मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१३. संचालक तथा उप सचिव, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई (कार्यासन-३० मार्फत)
१४. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई (कार्यासन-३० मार्फत)
१५. आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
१६. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
१७. उप सचिव, कार्यासन-३६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. उप सचिव, कार्यासन-३३, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. उप सचिव, कार्यासन-२४, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१९/कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.

शासन निर्णय क्रमांक सीईआर-२०१८/प्र.क्र.८१/३०, दिनांक ३० जुलै, २०१८ सोबतचे

**विवरणपत्र - ब**

| अ.क्र. | वित्तिय शक्तीचे वर्णन | अधिकारांचा वापर करण्यास सक्षम प्राधिकारी | वित्तीय शक्तीची मर्यादा | | अटी |
|---|---|---|---|---|---|
| | | | पूर्वी असलेली वित्तीय मर्यादा | सुधारीत वित्तीय मर्यादा | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ३ | २६ जानेवारी या प्रजासत्ताक दिन सोहळयाचे संचलन समारंभ आयोजनाच्या खर्चाला मंजुरी देणे. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव व मुख्य राज शिष्टाचार अधिकारी | रु.२५ लक्ष प्रतिवर्षी | रु.७० लक्ष प्रतिवर्षी | १. अर्थसंकल्पात तरतूद असली पाहिजे.<br>२. वस्तु आणि सेवा यांच्या खरेदीसाठी विहित कार्यपध्दतीचे आणि वेळोवेळी काढलेल्या आदेशाचे अनुपालन करण्यात यावे.<br>३. निविदा प्रक्रीया अवलंबून सेवा पुरवठादारांची नियुक्ती करण्यात यावी. निविदा मागविणे शक्य नसेल त्यावेळी विविध विभागांना सातत्याने दरपत्रके मागवून तीन अधिकाऱ्यांच्या समितीमार्फत सेवा पुरवठादाराची निवड करण्यात यावी.<br>४. ई-निविदा प्रक्रिया लागू असल्यास त्याचे पालन करावे. |
| ४ | महाराष्ट्र दिन (१ मे) खर्चाला मंजुरी देणे | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव /सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी | रु.२५ लक्ष प्रतिवर्षी | रु.७० लक्ष प्रतिवर्षी | १. अर्थसंकल्पात तरतूद असली पाहिजे.<br>२. वस्तु आणि सेवा यांच्या खरेदीसाठी विहित कार्यपध्दतीचे आणि वेळोवेळी काढलेल्या आदेशाचे अनुपालन करण्यात यावे.<br>३. निविदा प्रक्रीया अवलंबून सेवा पुरवठादारांची नियुक्ती करण्यात यावी. |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | ४. ई-निविदा प्रक्रिया लागू असल्यास त्याचे पालन करावे. |
| ५ | स्वतंत्रता दिवस (१५ ऑगस्ट) खर्चाला मंजुरी देणे | अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी | रु.२५ लक्ष प्रतिवर्षी | रु.७० लक्ष प्रतिवर्षी | १. अर्थसंकल्पात तरतूद असली पाहिजे.<br>२. वस्तु आणि सेवा यांच्या खरेदीसाठी विहित कार्यपध्दतीचे आणि वेळोवेळी काढलेल्या आदेशाचे अनुपालन करण्यात यावे.<br>३. निविदा प्रक्रीया अवलंबून सेवा पुरवठादारांची नियुक्ती करण्यात यावी. निविदा मागविणे शक्य नसेल त्यावेळी विविध विभागांना सातत्याने दरपत्रके मागवून तीन अधिकाऱ्यांच्या समितीमार्फत सेवा पुरवठादाराची निवड करण्यात यावी.<br>४. ई-निविदा प्रक्रिया लागू असल्यास त्याचे पालन करावे. |